साखर निर्यात अनुदान साखर कारखान्यांना वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ससाका- २०१५/प्र.क्र. २४३/२५ स,**
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
तारीख:- ०८/११/२०१६.

वाचा :-

१) शासन निर्णय क्रमांकः शासन निर्णय,सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक:-ससाका-१००७/प्र.क्र.१९४ /२५ स,दिनांक १३/०४/२००७
२) शासन निर्णय क्रमांकः शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक:-ससाका-२०१५/प्र.क्र.५३ /२५ स,दिनांक २३/०६/२०१५
३) शासन निर्णय क्रमांकः शासन परिपत्रक वित्त विभाग, क्रमांक:-पूरक-२०१५/प्र.क्र.१४०/ अर्थसंकल्प-३ / दिनांक ६/१०/२०१५
४) शासन निर्णय,सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक: -ससाका २०१५/प्र.क्र.५३ /२५ स दिनांक २३/६/२०१५
५) शासन निर्णय,सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक: -ससाका २०१५/प्र.क्र.२४३/२५ स दिनांक २३/३/२०१६ व दि. २८/३/२०१६
६) साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य,पुणे यांचे पत्र जावक क्रमांक साआ/उपप /कक्ष-१३/ मा. मं. / सा नि बै इति /२०१६ /४२२/६९३१९ दिनांक २७.९.२०१६

शासन निर्णय

राज्यातील हंगाम २०१४-१५ मध्ये उत्पादीत झालेल्या विक्रमी साखरेचे देशांतर्गत विपणन चालु बाजारभावात केल्यास साखर कारखान्यांना आर्थिक नुकसान होण्याची शक्यता होती. म्हणून राज्यातील उत्पादित कच्च्या साखरेच्या २०१४-१५ या कालावधीतील निर्यातीसाठी प्र.मे.टन रु.१०००/- प्रोत्साहनपर रक्कम अदा करण्याचा शासन निर्णय क्रमांक ससाका २०१५/प्र.क्र.५३/२५-स,दि.२३/६/२०१५ निर्गमित करण्यात आला आहे. शासन निर्णय दि.१३.४.२००७ अन्वये मा. मंत्री सहकार ह्यांच्या अध्यक्षतेखालील दि. ३०.८.२०१६ रोजी झालेल्या बैठकीत या योजने अंतर्गत प्राप्त प्रस्ताव मान्यतेसाठी ठेवण्याचे साखर आयुक्त यांनी प्रस्तावित केले. परंतु शासन निर्णय दि. १३.४.२००७ अन्वये गठीत केलेली समिती हि फक्त सन २००७-०८ साठी असल्यामुळे साखर निर्यात अनुदानाचे प्रस्तावांना मान्यता देण्याचे अधिकार साखर आयुक्त , पुणे यांना प्रदान करण्याचा निर्णय सदर बैठकीत घेण्यात आला आहे. त्यानुसार या योजने अंतर्गत प्राप्त साखर निर्यात अनुदानाचे प्रस्ताव तपासून मान्यता देण्याचे अधिकार साखर आयुक्त, पुणे यांना प्रदान करण्यात करण्यात येत आहेत. साखर आयुक्त, पुणे ह्यांनी शासन निर्णय दि. २३.६.२०१५, दि. २३.३.२०१६ व दि.२८.३.२०१६ मधील निर्देशाप्रमाणे या योजने अंतर्गत प्राप्त साखर निर्यात अनुदानाचे प्रस्ताव तपासून त्यांच्या स्तरावर मान्यता द्यावी व अनुज्ञेय तरतुद वितरीत करण्यासाठी विहित प्रस्ताव शासनास सादर करावा.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६११०८१७३१४४५७०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Deepak S Desai

Digitally signed by Deepak S Desai
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=CMT Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4d11b2ee4dfa01facc6e58028a3bde93d4ac81d87ed6247ca0fb3a827602426f, cn=Deepak S Desai
Date: 2016.11.08 17:33:55 +05'30'

( दि.शि.देसाई )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१. मा. मंत्री ( सहकार ) यांचे खाजगी सचिव
२. मा. प्रधान सचिव ( सहकार ),सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग , मंत्रालय ,मुंबई
३. साखर आयुक्त, साखर संकुल , पुणे,
४. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, मुंबई, नागपूर,
५. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी साखर कारखाना संघ मर्यादित,नरिमन पॉईंट, मुंबई
६. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बकॅ मर्यादित, मुंबई.
७. कार्यकारी संचालक, संबंधित सहकारी साखर कारखाने , साखर आयुक्त, पुणे यांच्या मार्फत.
८. सर व्यवस्थापक, जिल्हा मध्यवर्ती बँक लि. सातारा/औरंगाबाद /सोलापूर/ कोल्हापूर/ हिंगोली/ अहमदनगर
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१०. निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
११. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
१२. वित्त विभाग, व्यय-२/ कराधान-३/ अर्थसंकल्प-३/ अर्थसंकल्प-१२,
१३. सर्व सह सचिव/उप सचिव /अवर सचिव व कक्ष अधिकारी, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय, मुंबई,
१४. अवर सचिव ( अर्थसंकल्प ), सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय, मुंबई,
१५. निवडसंग्रह (२५-स) सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.